**महाराष्ट्र वन विकास महामंडळाकरिता नविन वाहने खरेदीस मंजूरी देणेबाबत. निर्लेखित वाहनाच्या एकूण संख्येच्या ७५ टक्के मर्यादेपर्यत नविन वाहने खरेदीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.एफडीसी-२०१४/प्र.क्र.१९३/फ-५**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०५/०२/२०१५

संदर्भ:- १) व्यवस्थापकीय संचालक, एफडीसीएम लि. नागपूर यांचे पत्र क्रमांक महाव्य (मुख्यालय)/भांडार/ ३८२० नागपूर दिनांक १२ डिसेंबर, २०१४
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:वाहन २०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम, मंत्रालय, मुंबई-३२ दिनांक २२/०८/२०१४

**प्रस्तावना-**

वित्त विभागाचा दिनांक २२/०८/२०१४ च्या शासन निर्णयानुसार ज्या प्रशासकीय विभागांचा वाहन आढावा पूर्ण झालेला नसेल अशा प्रशासकीय विभागांना सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून दि.३१ मार्च, २०१५ पर्यंत राज्य स्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेशिवाय त्यांच्या अधिपत्याखालील खुद्द तसेच क्षेत्रीय कार्यालयातील निर्लेखित वाहनांच्या एकूण संख्येच्या ७५% मर्यादेपर्यत प्रशासकीय विभागाच्या मान्यतेने नविन वाहने खरेदी करण्यास परवानगी देण्यात आली आहे. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ नागपूर यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये त्यांचे अधिपत्याखालील निर्लेखित केलेल्या ४२ वाहनांच्या ७५% म्हणजे ३१ वाहने खरेदीचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. सदरहू प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ नागपूर यांच्या अधिपत्याखालील निर्लेखित केलेल्या ४२ वाहनांच्या ७५% म्हणजे ३१ वाहने खरेदी करण्यास खालील शर्ती व अटीचे अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर वाहनांच्या खरेदीसाठी कंपनीच्या अंतर्गत स्त्रोतातून निधी उपलब्ध करुन देण्यात यावा. याचा कोणताही वित्तीय भार शासनावर पडणार नाही याची दक्षता घ्यावी.
२. वाहन अनुज्ञेय असणाऱ्या एका अधिकाऱ्याच्या वापरात फक्त एकच वाहन असावे.
३. वाहन निर्लेखित झाल्यानंतर त्या वाहनाचा पुन्हा वापर करता येणार नाही.
४. वाहन चालकाचे पद मंजूर/उपलब्ध असणे आवश्यक आहे. कोणत्याही परिस्थितीत वाहन चालकांची नवीन नदे निर्माण करण्यात येऊ नयेत.

५. शासकीय अधिकाऱ्यांच्या कर्तव्याच्या अनुषंगाने वाहने अनुज्ञेय करण्यात येते. वाहन अनुज्ञेय असणाऱ्या अधिकाऱ्यांच्या वापरातील ज्या प्रकारचे वाहन (जीप/कार) निर्लेखित करण्यात आले असेल, त्या वाहनाऐवजी संबंधित पदासाठी त्याच प्रकारचे वाहन (दि.८ मे, २०१४ व दि.४ ऑगस्ट, २०१४ च्या शासन निर्णयान्वये व दि. ७ ऑगस्ट २०१४ च्या शुध्दीपत्रकान्वये अनुज्ञेय असलेल्या व यापुढे वेळोवेळी सुधारणा करण्या येणाऱ्या शासन निर्णयातील अनुज्ञेय किंमत मर्यादेतील) खरेदी करता येतील.

**खरेदी करावयाचा नविन वाहनांचा तपशिल**

| अ.क्र. | वाहनांचा प्रकार | निर्लेखित वाहने | ७५% प्रमाणे येणारी वाहन संख्या |
|---|---|---|---|
| १ | कार | ४ | ३ |
| २ | जीप | २३ | १७ |
| ३ | ट्रॅक्टर | १३ | १० |
| ४ | मिनीबस | २ | १ |
| | **एकूण** | **४२** | **३१** |

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५/१५/विनियम, दि.१३/०१/२०१५ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०५१६५३५३८९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.02.05 17:02:20 +05'30'

**(डॉ.यु.एम.फारुकी)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१) व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम. लि. नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) महालेखापाल १/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
४) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
५) कार्यासन, व्यय-१०/विनियम, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) कार्यासन फ-५, निवड नस्ती